मंजूर विकास नियंत्रण नियमावली - ठाणे
महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम,
१९६६चे कलम-१५४ अन्वये निदेश......

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक:-१४ जुलै, २००४

-- आ दे श --

क्रमांक:-विपप्र/टिपीएस-१२०४/४२०/प्र.क्र.७३/२००/नवि-१२.

महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम, १९६६.

ज्याअर्थी सुधारित विकास योजना ठाणे शासनाचे नगर विकास विभागाने दि.४ ऑक्टोबर,१९९९ अन्वये मंजूर केली असून वगळलेल्या भागाची विकास योजना (ई.पी) दि.३.४.२००३ रोजी मंजूर झाली असून ती दि.१४ मे,२००३ पासून अंमलात आली.

आणि ज्याअर्थी ठाणे शहराची विकास नियंत्रण नियमावली शासनाचे नगर विकास विभागाने दि.२८.४.१९९५ रोजी मंजूर केली असून ती दि.१ जून,१९९५ पासून अंमलात आली (यापुढे "उक्त विकास नियंत्रण नियमावली" असे संबोधलेली)

आणि ज्याअर्थी, ठाणे महानगरपालिका क्षेत्रामधील बंद कंपन्यांच्या जागेवर बांधकाम परवानगी देतेवेळी कामगारांचे हित लक्षातघेता त्यांची कायदेशिर देणी पूर्णपणे दिली आहेत. याची खातरजमा ठाणे महानगरपालिकेने विकास परवानगी मंजूर करतेवेळी करणे आवश्यक आहे.

आणि ज्याअर्थी उक्त विकास नियंत्रण नियमावलीमध्ये अशा प्रकारची तरतुद नसल्याने अशाप्रकारची तरतुद विकास नियंत्रण नियमावलीमध्ये करणे जरुरीचे आहे. असे शासनाचे मत आहे.

त्याअर्थी शासन सर्व गोष्टींचा विचार करुन ठाणे महानगरपालिकेस (यापुढे "उक्त महानगरपालिका" म्हणून संबोधलेली) महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम,१९६६ च्या कलम-१५४ अन्वये खालील निदेश देत आहे.

-- नि दे श --

उक्त महानगरपालिकेच्या उक्त विकास नियंत्रण नियमावलीमध्ये खालील नमूद तरतुद समाविष्ट करणेबाबत महानगरपालिकेने उक्त अधिनियमाच्या कलम-३७ मधील तरतुदीस अधीन राहून ६० दिवसांच्या विहित कालावधीत तशी फेरबदलाची सूचना विहित मार्गाने प्रसिध्द करावी व उक्त अधिनियमाच्या तरतुदीचे पालन करुन फेरबदलाचा प्रस्ताव शासनाकडे अंतिम मंजूरीसाठी सादर करावा.

क्रमाप. ..

तरतुद:- ठाणे महानगरपालिका क्षेत्रातील बंद कंपन्यांच्या जागेवर औद्योगिक वापरातून रहिवास वापराबाबत बांधकाम परवाना देणेपूर्वी कामगार उपआयुक्त ठाणे यांचेकडुन संबंधीत जागेवरील कंपनी कडून त्याच्याकडे असलेल्या सर्व कामगारांची कायदेशिर देणी पूर्णपणे मिळाली आहे असा दाखला प्राप्त करुन घेणे आवश्यक आहे.

सदर तरतुद निदेशाच्या दिनांकापासून लागू राहील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( न. र. राणे )
कक्ष अधिकारी

प्रत आवश्यक त्या कार्यवाहीसाठी....

मा.आयुक्त, ठाणे महानगरपालिका प्रशासकीय भवन, पाचपाखाडी ठाणे.

प्रत माहितीसाठी...

१) मा.कामगार आयुक्त, महाराष्ट्र राज्य कॉमर्स सेंटर ६/७ वा मजला, ताडदेव, मुंबई-४०००३४.

२) मा.संचालक नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे.

३) मा.उपसंचालक नगर रचना, कोकण विभाग, कोकण भवन, नवी-मुंबई.

४) मा.सहायक संचालक नगर रचना, ठाणे शाखा, जिल्हाधिकारी कार्यालय, ठाणे.